सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात राज्य अनुदानातून Extended Half Life Factor VIII ची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा -१२२५/प्र.क्र.८० /आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २१ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

(१) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-३/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६
(२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रशामा-१२२३/ प्र.क्र. २५१/ आरोग्य-८, दिनांक २७ डिसेंबर, २०२३, शुद्धीपत्रक दिनांक २४.०१.२०२४ व दिनांक ०८.०२.२०२४
(३) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन ज्ञापन क्रमांक संकिर्ण-१०२४/ प्र.क्र. ४७/ आरोग्य-८, दिनांक ३१ मार्च, २०२४
(४) सहसंचालक आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/न.क्र.१४/सन २३-२४ अनु/अँटी-हिमोफिलिक फॅक्टर्स प्र.मा./४६६४-६८/२०२५ दि.२४.०३.२०२५
(५) सहसंचालक आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/कक्ष-३/टे-४/न.क्र.१४/सन २३-२४ अनु/अँटी-हिमोफिलिक फॅक्टर्स प्र.मा./खुलासा/५०३७४०/२०२५, दि.२८.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

वाचा मधील अ.क्र.४ व ५ येथील दि. २४.०३.२०२५ व दि.२८.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी प्रस्तावीत केलेल्या, राज्यातील विभागीय संदर्भसेवा जिल्हा/ स्त्री/ सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर व इतर रुग्णालयांसाठी लागणा-या औषधी व कंझ्युमेबल्स, प्रयोगशाळा साहित्य व रसायने, रुग्णालयीन कापड-चोपड (लिनन), छोटी हत्यारे व सर्जिकल्स इत्यादी बाबींची खरेदी करण्यासाठी २१-पुरवठा व सामग्री या उदिष्टाखाली विविध लेखाशिर्षांतर्गत (लेखाशिर्ष २२१० ०१४६, २२१० ०४१३, २२१० ०३१५, २२१० ३०४७, २२१०जी २९८, २२१० ०२२६, २२१० ई ४८२ व २२१० ४२५९) अंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाकडे शिल्लक राहीलेल्या अनुदानातून सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात Extended Half Life Factor VIII ची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. वरील वस्तुस्थिती विचारात घेता, राज्यातील विभागीय संदर्भसेवा जिल्हा/ स्त्री/ सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर व इतर रुग्णालयांसाठी लागणा-या औषधी व कंझ्युमेबल्स, प्रयोगशाळा साहित्य व रसायने, रुग्णालयीन कापड-चोपड (लिनन), छोटी हत्यारे व सर्जिकल्स इत्यादी बाबींची खरेदी करण्यासाठी २१-पुरवठा व सामग्री या उदिष्टाखाली विविध लेखाशिर्षांतर्गत (लेखाशिर्ष २२१० ०१४६, २२१० ०४१३, २२१० ०३१५, २२१० ३०४७, २२१०जी २९८, २२१० ०२२६, २२१० ई ४८२ व २२१० ४२५९) अंतर्गत महाराष्ट्र

वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाकडे शिल्लक राहीलेल्या अनुदानातून सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात Extended Half Life Factor VIII या औषधाची खरेदी महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई यांच्या मार्फत करण्यास रु.४,४९,९१,१३५/- इतक्या रकमेच्या खरेदी करण्यास खालील नमूद अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(१) सदरहू Extended Half Life Factor VIII या औषधाची आवश्यकता असल्याची खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

(२) सदरहू Extended Half Life Factor VIII यांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

(३) सदर खरेदी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबवुन करावी.

(४) सदर खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल तसेच या बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(५) सदर खर्च राज्यातील विभागीय संदर्भसेवा जिल्हा/ स्त्री/ सामान्य/ उपजिल्हा/ ग्रामीण/ कुटीर व इतर रुग्णालयांसाठी लागणा-या औषधी व कंझ्युमेबल्स, प्रयोगशाळा साहित्य व रसायने, रुग्णालयीन कापड-चोपड (लिनन), छोटी हत्यारे व सर्जिकल्स इत्यादी बाबींची खरेदी करण्यासाठी २१-पुरवठा व सामग्री या उदिष्टाखाली विविध लेखाशिर्षांतर्गत (लेखाशिर्ष २२१० ०१४६, २२१० ०४१३, २२१० ०३१५, २२१० ३०४७, २२१०जी २९८, २२१० ०२२६, २२१० ई ४८२ व २२१० ४२५९) अंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाकडे शिल्लक राहीलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

(६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई, व आयुक्त ,आरोग्य सेवा आयुक्तालय ,मुंबई तसेच सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

(७) तसेच सदर खरेदी झाल्यानंतर खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र सहसंचालक आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी शासनास सादर करण्यात यावे.

३. सदर खरेदीच्या संदर्भात खरेदीच्या अनुषंगाने अनुदानाचा व प्रशासकीय मान्यतेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**विवरणपत्र**

**अनुदानाचा तपशील**

**(रक्कम रुपयांत)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशील | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २२१० ०१४६<br>२२१० ०४१३<br>२२१० ०३१५<br>२२१० ३०४७<br>२२१० जी २९८<br>२२१० ०२२६<br>२२१० ई ४८२<br>२२१० ४२५९ | Extended Half Life Factor VIII 500IU/ Vial | रु.४,४९,९१,१३५ |

४. उपरोक्त परिच्छेद क्र.२ मधील अनुक्रमांक १ ते ७ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई, व आयुक्त ,आरोग्य सेवा आयुक्तालय ,मुंबई तसेच सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२११०५४११७२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.04.21 11:19:34 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी , महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
५) सहसंचालक आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई.
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१०) निवडनस्ती (आरोग्य-८)